१३ वा वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण
योजनेचा निधी वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वित्त आयोग-१५/प्र.क्र. ९६/ का.१४८१-अ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: १६ नोव्हेंबर, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय नियोजन विभाग, क्रमांक वित्त आयोग-११/प्र.क्र. ४२/ का.१४८१-अ दिनांक ४ डिसेंबर, २०१२

२) शासन पत्र नियोजन विभाग, क्रमांक वित्त आयोग-११/प्र.क्र.४२/का.१४८१-अ दिनांक -१२/०२ /२०१३.

३) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांक वित्त आयोग-११/प्र.क्र.४२/का.१४८१-अ, दिनांक . १० जून, २०१३

४) शासन पत्र नियोजन विभाग क्रमांक वित्त आयोग-११ /प्र.क्र.४२/ का.१४८१-अ दिनांक. २९/०३/२०१४.

५) शासन पत्र नियोजन विभाग क्रमांक वित्त आयोग-११ /प्र.क्र.४२/ का.१४८१-अ दिनांक २९ नोव्हेबर,२०१४.

६) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. वित्त आयोग-११/प्र.क्र. ४२/ का.१४८१-अ दिनांक १ डिसेंबर, २०१४

७) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक पूरक-२०१५ /प्र.क्र.१४० / अर्थसंकल्प - ३ दिनांक ११ सप्टेंबर,२०१५.

**प्रस्तावना -**

१३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आहे. केंद्र शासनाच्या १३ व्या वित्त आयोगाच्या निधीतून राज्यातील प्रत्येक जिल्हयांना जिल्हा नाविन्यपूर्ण योजनेसाठी प्रतिवर्ष रु.२०.०० लक्ष प्रमाणे ५ वर्षाकरीता रु.१.०० कोटी निधी अपेक्षित होता. सदर योजना ९० टक्के शासनाचा सहभाग व १० टक्के हिस्सा लोक सहभाग /अशासकीय संस्थाचा सहभाग या स्वरुपाची आहे. सदर योजनेचा कालावधी मार्च, २०१५ अखेर संपूष्टात आला आहे. या योजनेअंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या जिल्ह्यांच्या कृती आराखड्यानुसार संदर्भाधीन (३),(४) व (६) अन्वये अनुक्रमे रु. ६२७.०० लक्ष , रु. ३३३.०० लक्ष व रु. ७९०.०० लक्ष निधी वितरित करण्यात आला होता. तथापि, कांही जिल्ह्यातील प्रगतीपथावरील कामासाठी राज्य शासनावर रु. ९०.४३ लक्ष दायित्व

असल्याचे निदर्शनास आले आहे. सदर दायित्व अदा करण्यासाठी रु. ९०.४३ लक्ष रकमेच्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास सन २०१५ च्या दुस-या (पावसाळी) अधिवेशनात मान्यता देण्यात आली आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१३ वा वित्त आयोगाचा कालावधी मार्च, २०१५ अखेर संपूष्टात आला असल्याने, या निधीतून जिल्हा नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत मान्यता दिलेल्या कृती आराखड्यातून हाती घेण्यात आलेल्या कामांपैकी अद्यापही प्रगतीपथावर असलेली कामे विचारात घेता जिल्हा नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत मान्य आराखड्यांनुसार प्रगतीपथावरील कामासाठी रायगड, अहमदनगर, परभणी व बुलडाणा या जिल्ह्यांकडून रु. ९०.४३ लक्ष दायित्व असल्याची माहिति प्राप्त झाली आहे. सदर दायित्व अदा करण्यासाठी रु. ९०.४३ लक्ष रकमेच्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास सन २०१५ च्या दुस-या (पावसाळी) अधिवेशनात मान्यता देण्यात आली आहे. सदर दायित्व विचारात घेता प्रगतीपथावरील कामे पूर्ण करण्यासाठी खालील विवरण पत्रात स्तंभ ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे निधी वितरित करण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | निधी वितरण |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | रायगड | ६.१२ |
| २ | अहमदनगर | ६३.०० |
| ३ | परभणी | १४.९२ |
| ४ | बुलडाणा | ६.३९ |
| | एकूण | ९०.४३ |

२. शासनाचा सहभाग असलेला ९० % निधी उपलब्धतेप्रमाणे वितरित करण्यापूर्वी १०% लोकसहभाग /अशासकीय संस्थांचा हिस्सा जिल्हाधिकारी यांचेकडील बँक खात्यात जमा करणे आवश्यक आहे. सदर निधी खर्च करताना १३ व्या वित्त आयोगांतर्गत मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच निधी खर्च करावा. (जास्तीत जास्त रु.१ कोटी) तसेच, निधी खर्च करताना उपरोक्त नमूद दि. ४.१२.२०१२ च्या शासन निर्णयात व या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करूनच,

निधी खर्च करावा. निधी विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमत: जिल्हाधिकारी यांची राहील.या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणा-या कामांचा प्रगती अहवाल दरमहा १० तारखेपर्यंत कार्यान्वयीन यंत्रणांनी जिल्हाधिकारी यांना सादर करावा. जिल्हाधिकारी यांनी एकत्रित अहवाल दरमहा २० तारखेपूर्वी शासनास सादर करावा. तसेच निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र, आर्थिक / भौतिक अहवालही त्या अहवालासोबत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी," मागणी क्र. ओ-१०, ४५१५- इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, १०२ सामुहिक विकास, (००)(४१) १३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना (४५१५०८५२), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी वितरण हे वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९१अ /१५/ व्यय ८ दि. २०/०८/२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र.११२/२०१५ विआक दि.२५/०८/२०१५ च्या नुसार प्राप्त मान्यतेप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका खंड १ मधील परिच्छेद १६६ नुसार दिलेल्या प्राधिकारानुसार "मागणी क्र. ओ-१०, ४५१५- इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, १०२ सामुहिक विकास, (००)(४१) १३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा नाविन्यपूर्ण योजना (४५१५०८५२) ५३ मोठी बांधकामे" या खालील निधी त्याच लेखाशिर्षाखालील "३१ सहायक अनुदाने" याकरिता पुनर्वितरणाने उपलब्ध करून देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११६१७१०५०३११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil V Saware

Digitally signed by Anil V Saware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anil V Saware
Date: 2015.11.17 13:00:10 +05'30'

(अनिल वि.सावरे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२) महालेखापाल १/२, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३) विभागीय आयुक्त ,कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती,

४) उप आयुक्त (नियोजन) , कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती,

५) जिल्हाधिकारी ,रायगड, अहमदनगर, परभणी, बुलडाणा,

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, अहमदनगर, परभणी, बुलडाणा,

७)संचालक, अर्थ व सांख्यिकीसंचालनालय, नविन प्रशासकीय इमारत,मंत्रालयासमोर मुंबई

८) जिल्हा नियोजन अधिकारी , रायगड, अहमदनगर, परभणी, बुलडाणा,

९) जिल्हा कोषागार अधिकारी , रायगड, अहमदनगर, परभणी, बुलडाणा,

१०) कक्ष अधिकारी (का.१४८१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) निवड नस्ती, (का. १४८१-अ). नियोजन विभाग.

\-----------------